महिला व बाल विकास विभागातील गट-अ संवर्गातील प्रशासकीय कारणास्तव बदल्यांबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन आदेश क्रमांक : मबाआ- २०२१/प्र.क्र.९०/कार्या-७**
हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २२ सप्टेंबर, २०२१.

**संदर्भ:-** १. शासन आदेश क्रमांक : मबाआ- २०२१/प्र.क्र.९०/कार्या-७, दि. ३०.७.२०२१.
२. आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांचे जा.क्र. मबाविआ/आस्था/गट-अ बदली/२०११/३३१७, दि. २.८.२०२१ चे आदेश.
३. मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई यांचे मुळ अर्ज क्र. ५२८/२०२१ मधील दि. २७.८.२०२१ रोजीचे आदेश.

**शासन आदेश**

महिला व बाल विकास विभागातील गट-अ संवर्गातील प्रशासकीय कारणास्तव बदल्यांचे आदेश संदर्भ क्र. १ अन्वये निर्गमित करण्यात आले होते. सदर आदेशाच्या विरुध्द श्री. डी. बी. मुंडे यांनी मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे मुळ अर्ज ५२८/२०२१ दाखल केला होता. तद्नुषंगाने मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई यांनी संदर्भ क्र. ३ अन्वये दि. २७.८.२०२१ रोजी खालीलप्रमाणे आदेश पारित केलेले आहेत.

> "Original Application is allowed and both the orders are hereby quashed and set aside. However, this order will not come in way of the Government to take correct steps as per law. "

२. मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई यांच्या उपरोक्त आदेशाच्या अनुषंगाने तसेच महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्याचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४ (४) व ४ (५) तसेच कलम ६ मधील तरतूदीनुसार सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने आणि सक्षम प्राधिकारी यांच्या लगतपूर्व वरिष्ठ प्राधिकाऱ्यांनी दिलेल्या मान्यतेनुसार या विभागातील खालील अधिका-यांचे त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या ठिकाणी सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय कारणास्तव बदली आदेश निर्गमित करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | अधिका-याचे नाव | सध्या कार्यरत कार्यालय | बदलीने पदस्थापनेचे कार्यालय | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्री. डी.बी. मुंडे | जिल्हा कार्यक्रम अधिकारी (मवबावि) जि.प. पुणे | परिविक्षा अधिक्षक, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे | --- |
| २ | श्री. जे.बी.गिरासे | बाल विकास प्रकल्प अधिकारी (ना), कुर्ला | जिल्हा कार्यक्रम अधिकारी (मवबावि) जि.प. पुणे | श्री. गिरासे यांनी त्यांच्या मूळ पदाचा कार्यभार श्रीम. प्रेमा घाटगे, बाल विकास प्रकल्प अधिकारी (ना), चेंबूर यांचेकडे सोपवून तसेच त्यांच्याकडे असलेला बाल विकास प्रकल्प अधिकारी (ना) गोरगाव (पूर्व) या पदाचा अतिरिक्त कार्यभार श्रीम. मिनाक्षी बिराजदार, बाल विकास प्रकल्प अधिकारी (ना), बोरिवली-१ यांचेकडे सोपवून बदलीच्या पदावर तात्काळ रुजू व्हावे. |

३. सदर आदेश तात्काळ अंमलात येतील. सदर अधिकाऱ्यांनी बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास, ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

४. आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांनी या आदेशाप्रमाणे सदर अधिकाऱ्यांना त्यांच्या पदभारातून तात्काळ कार्यमुक्त करण्याबाबत संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांना तातडीने कळवावे व बदली झालेले अधिकारी विहीत कालावधीत दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी रूजू होतील, याची खातरजमा करावी व याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

५. वरीलप्रमाणे करण्यात येत असलेल्या अधिकाऱ्यांच्या पदस्थापनेच्या आदेशासोबत त्यांचे गोपनीय अहवाल, सेवापुस्तक, तसेच अंतिम वेतन प्रमाणपत्र बदली करण्यात आलेल्या नवीन कार्यालयाकडे तात्काळ पाठविण्यात यावे.

६. वरीलप्रमाणे पदस्थापना करण्यात आलेल्या अधिकाऱ्यांना पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करु नये वा महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम १९८१ मधील नियम ३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने पदस्थापना झालेल्या अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत.

७. वरीलप्रमाणे पदस्थापना करण्यात येत असलेल्या अधिकाऱ्यांना पदस्थापनाने देण्यात आलेल्या पदावर रुजू करुन घेताना, ते रजेवर / गैरहजर होते किंवा कसे याबाबतची खातरजमा त्यांना पदस्थापनेवर हजर करुन घेणाऱ्या कार्यालयाने करावी. सदर अधिकारी वैद्यकीय कारणास्तव गैरहजर असतील तर त्यांना हजर करुन घेण्यापूर्वी वैद्यकीय मंडळासमोर पाठवावे. जर अन्य रजेवर होते असे आढळल्यास त्यांचेकडून न चुकता तसा रजेचा अर्ज भरुन घ्यावा आणि नंतर हजर करुन घ्यावे. तसेच रजा संदर्भात शासनाने वेळोवेळी प्रसृत केलेल्या शासन निर्णय / परिपत्रकांतील निदेशांचे पालन करावे.

८. महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळांतील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियमानुसार दिलेल्या पदग्रहण अवधीतच, बदली झालेल्या अधिकाऱ्याने बदलीच्या ठिकाणी रुजू होण्याची दक्षता घ्यावी. अन्यथा या पदग्रहण अवधीत बदलीच्या ठिकाणी रुजू न झाल्यास, त्यांचा अनुपस्थितीचा कालावधी हा अकार्यादिन (dies non) म्हणून गणला जाईल.

९. सदरहू बदल्या हया प्रशासकीय बदल्या असल्याने उपरोक्त अधिकाऱ्यांना बदली विषयक प्रवासभत्ता व इतर अनुषंगिक लाभ अनुज्ञेय असतील.

१०. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२१०९२२१०५४३९८२३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

RAJENDRA T BHALWANE

Digitally signed by RAJENDRA T BHALWANE
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=38d121bf4a170d16dacf98520f0ac4455197693 1d2758148ccaa24d1fb27b9df, serialNumber=badfc0daa40cc485400aad9ceabcd5140 95659a6cdfac856815518dcd188c23a, cn=RAJENDRA T BHALWANE
Date: 2021.09.23 11:55:33 +05'30'

( रा. ता. भालवणे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे.
२. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, रायगड भवन, नवी मुंबई.
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे.
४. मा.मंत्री (म.व बा.वि), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.राज्यमंत्री (म.व बा.वि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा. प्रधान सचिव (म.व बा.वि),यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
७. संबंधित विभागीय उप आयुक्त, महिला व बाल विकास विभाग (आयुक्तालय, पुणे मार्फत).
८. महालेखापाल १ / २ (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखापरिक्षा), मुंबई /नागपूर (आयुक्तालय, पुणे मार्फत).
९. संबंधित अधिदान व लेखाधिकारी / जिल्हा कोषागार अधिकारी (आयुक्तालय, पुणे मार्फत).
१०. सर्व संबंधित अधिकारी, (आयुक्तालय, पुणे मार्फत).
११. निवडनस्ती, कार्यासन ७ महिला व बाल विकास विभाग.